# . . श्री मारुति स्तोत्र . .

भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती
वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना ...1

महाबळी प्राणदाता सकळा ऊठवी बळें
सौख्यकारी दुःखहारी दूतवैष्णव गायका ...2

दिनानाथा हरीरूपा सुंदरा जगदांतरा
पाताल देवताहंता भव्यसिंदूर लेपना ...3

लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना
पुण्यवंता पुण्यशीला पावना परितोषका ...4

ध्वजाग्री उचली बाहो आवेशें लोटला पुढें
काळाग्नि काळरुद्राग्नि देखता कांपति भये ...5

ब्रह्मांडे माइली नेणो आवळे दंतपंगती
नेत्राग्नि चालिल्या ज्वाळा भ्रुकुटी त्राटिल्या बळे. . . 6

पुच्छते मुरडिले माथां किरीटी कुंडले बरीं
सुवर्ण कटिकासोटी घंटा किंकिण नागरा . . . 7

ठकारे पर्वताऐसा नेटका सडपातळू
चपळांग पाहता मोठे महाविद्युल्लतेपरी . . . 8

कोटिच्या कोटि उड्डाणे झेपावे उत्तरेकडे
मंद्राद्रीसारखा द्रोणु क्रोधें उत्पाटिला बळे ...9

आणिला मागुती नेला आला गेला मनोगती
मनासी टाकिलें मागे गतीसी तुळणा नसे ...10

अणुपासोनि ब्रह्मांडायेवढा होत जातसे
तयासी तुळणा कोठें मेरूमंदार धाकुटे ...11

ब्रह्मांडाभोंवते वेढे वज्रपुच्छे करूं शके
तयासी तुळणा कैची ब्रह्मांडीं पाहतां नसे ...12

आरक्त देखिले डोळां ग्रासिलें सूर्य मंडळा
वाढतां वाढतां वाढे भेदिले शून्य मंडळा ...13

धनधान्य पशुवृद्धि पुत्रपौत्र समग्रही
पावती रूपविद्यादि स्तोत्रे पाठें करूनिया ...14

भूतप्रेतसमंधादि रोगव्याधि समस्तही
नासती तुटतीं चिंता आनंदे भीमदर्शनें ...15

हे धरा पंधरा श्लोकीं लाभली शोभली बरी
दृढदेही निसंदेही संख्या चंद्रकळा गुणे ...16

रामदासी अग्रगण्य कपिकुळासी मंडण
रामरूपी अंतरात्मा दर्शनें दोष नासती ...17

इति श्रीरामदासकृतं संकटनिरसनं मारुतिस्तोत्रं संपूर्ण